श्रीशारदा मण्डल, ठाणें.

# डाक-घर



अनुवादक :
कै. काशीनाथ विनायक भागवत, बी. ए.

१९३०

किंमत ६ आणे.

# प्रकाशकांचे दोन शब्द



पुस्तक प्रसिद्ध करतांना दोन विरोधी भावनांनीं मन भरून जात आहे. आमचे परमप्रिय मित्र व मंडळाचे सन्मान्य सदस्य कै. का. वि. भागवत यांचा मृत्यु आम्हांला अजून स्वप्नवत् भासतो. त्याचें दुःख ताजें आहे. त्याच वेळीं त्यांची स्मृति सदैव ताजी ठेवणारें त्यांचें वाङ्मयीन अपत्य मूर्त स्वरूप धारण करीत आहे, हें पाहून मनाला थोडें बरें वाटत आहे.

कविवर्य रविंद्रनाथांच्या साहित्यांत 'डाक–घर' या नाटकाचा दर्जा बराच मोठा आहे. नाट्यसृष्टींतील क्रांतिकारक नाटकांपैकीं तें एक आहे. रूढ नाटकांतील पोकळ खडखडाट यांत आढळणार नाहीं. उलट काव्यात्मक विचारांचा संथ वाहणारा प्रवाह अनंताच्या अनंतत्वाची आणि अंतिम मानवी ध्येयाची जाणीव करून देत आहे असा भास होतो. बंगाली साहित्यांतील हें उत्कृष्ट खाजें महाराष्ट्र साहित्यभक्तांना निःसंशय रुचेल असा आम्हांला भरंवसा आहे.

पुस्तकप्रकाशनाच्या कामीं आम्हांला कै. भागवतांच्या अनेक मित्रांनीं जें प्रेम-पुरःसर साहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत. श्री. द. वि. देशपांडे, श्री. के. कृ. प्रधान आणि श्री. द. आ. कर्णिक यांनीं आम्हांला या बाबतींत फारच उपकारबद्ध केलें आहे. त्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख येथें केला नाहीं तर आमचें आम्हांलाच बरें वाटणार नाहीं.

कविवर्य रविंद्रनाथांच्या साहित्याचे निस्सीम अभ्यासक श्री. ऋग्वेदी यांनीं पुस्तकाला प्रस्तावना लिहून दिली याबद्दल आम्ही त्यांचे फार ऋणी आहोंत.

शेवटीं कर्नाटक प्रेसचे श्री. चंदावरकर यांनीं पुस्तकप्रकाशनाच्या बाबतींत वेळोवेळीं साहाय्य करून पुस्तक सुबक छापून दिलें त्याबद्दल त्यांचे आभार मानून हे दोन शब्द पुरे करितों.

ठाणें
विजयादशमी
ता. २ ऑक्टोबर १९३० } श्रीशारदा मण्डळ.

# प्रस्तावना



**जया माझें नाम कोंडुनि मरे तो । काल घालवितो कारागारीं ॥**
**रात्रंदिन सारें विसरोनि गेलों । केवळ गुंतलों एका कार्यीं ॥**
**तयाभोंवतीं म्यां भित्ति उभारिल्या । आकाशा भिडल्या हळूहळू ॥**
**जया माझें नाम अंधारीं तो पडे । सत्यरूप दडे दृष्टिआड ॥**
**भोंवतीं अजस्र दुर्ग हा वाढला । धुळीनें लिंपिला ठायीं ठायीं ॥**
**छिद्रें या भित्तीचीं बुजविलीं सारीं । चित्तीं गर्व भारी मत्कृतीचा ॥**
**उद्योगीं अखंड गुंतोनियां गेलों । विराम पावलों नाहीं कधीं ॥**
**मिथ्या या उपायें करितां जतन । निज आत्मधन हरपलें ॥**

अभंग गीतांजली–गीत ११.

एकदां उत्सवाकरितां गेलेली मंडळी गोंगाट करीत परत घरीं येत असतां अरुणोदय समयीं गुरुदेव कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर यांनीं ती गात असलेलें '**नाविका मजला नदीपार नेई**' या आशयाचें पद ऐकिलें. तेव्हां या भवनदीच्या पलीकडे जाण्याविषयींचे जे त्यांस विचार सुचले त्यांचें दृश्य '**डाक-घर**' या नाटिकेंत चित्रित केलें आहे. मूळ नाटिका बंगाली भाषेंत असून श्रीयुत देवव्रत मुकरजी यांनीं तिचें POST-OFFICE हें इंग्रजी भाषांतर केलें. तेंही रसभरीत आहे. लंडनमध्यें १९१३ सालीं रंगभूमीवर या लहान नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. त्या वेळेपासून सर्वांचें लक्ष त्याकडे गेलें आणि सर्वत्र त्याची प्रशंसा झाली. प्रस्तुत मराठी रूपांतर कै. वा. काशिनाथ विनायक भागवत, बी. ए. यांनीं केलें तें 'विविधज्ञानविस्ताराच्या' गतसालच्या कांहीं अंकांत प्रसिद्ध झालें आहे. हें मराठी रूपांतर हृदयंगम, चित्ताकर्षक व वाचकाच्या अंतःकरणांत शांति उत्पन्न करणारें असें झालें आहे. या नाटिकेंतील बालनायकाप्रमाणेंच डाक-घराच्या विद्यमानें आलेल्या राजाधिराजांच्या आज्ञे-नुसार भाषांतरकार श्री. भागवत हे हा लोक सोडून परंधामास गेले. त्यांची कृति मात्र राहिली. आणि ती स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रकाशित करण्याचें पुण्य

ठाणें येथील **श्रीशारदा मंडळानें** संपादन करून आपल्या मुक्त सदस्य मित्रा-बद्दलचें प्रेम व्यक्त केलें हें प्रशंसनीय आहे. या गतात्म्याच्या चरणीं प्रस्तावना-रूपी पुष्प अर्पण करण्याची संधी मंडळानें मला दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. हें पुष्प इतकें सुंदर व सुवासिक नसलें तरी तें प्रेमादरानें युक्त आहे इतकेंच येथें सांगतों.

**डाक-घराचें** कथानक साधें व अत्यंत प्रेमळ आहे. जीवात्मा सुखस्वरूप असून त्याची नित्यशः धडपड सुखरूप होण्यासाठीं आहे. प्रकृतीच्या आधीन झाल्यामुळें त्याला शाश्वत सुखाचा आस्वाद घेणें अशक्य होतें. तथापि रात्रं-दिवस त्याला वाटत असतें कीं **या प्रकृतीच्या भोंवतीं मांडलेला पसारा व आनंदाचीं साधनें कुचकामी असून त्यांच्या पलीकडे जाणें आणि विश्वाकार होऊन सर्वत्र संचार करणें हेंच जीविताचें साध्य आहे.** उपरिनिर्दिष्ट अभंगगीतांत गुरुदेवांनीं हेंच रहस्य कथन केलें आहे. खऱ्या सुखाची प्राप्ति म्हणजे आत्मसंतोष. ज्ञानोबा म्हणतातः—

> **नाना दुःखीं प्राप्तीं। जया उद्वेगु नाहीं चित्तीं। आणि सुखा-चिया आर्तीं। अडपैजेना ॥ ९४ ॥ जो सर्वत्र सदा सरिसा। परिपूर्ण चंद्र कां जैसा। अधमोत्तम प्रकाशा-। माजीं न म्हणे ॥ ९५ ॥ ऐसी अनवच्छिन्न समता। भूतमात्रीं सदयता। आणि पालट नाहीं चित्ता। कोणे वेळीं ॥** ज्ञा. अ. २

अशा प्रकारची वृत्ति हीच मुक्ति असून जीवनाची परिपूर्णता जी मरणावस्था ती प्राप्त झाल्यावर या मुक्तीचा अनुभव जीवात्म्यास येतो. हा मुक्तीचा संदेश प्रत्येकास पोहोंचविण्यासाठीं परमात्म्याचें **डाक-घर** प्रत्येकाच्या सन्निध आहे. आणि कितीही उपाय केले तरी भगवदाज्ञेचें उल्लंघन करणें शक्य नाहीं. ज्या वेळीं जीवात्म्यास प्रकृतिजन्य सुखांशीं समरस होणें असह्य व अशक्य होतें तेव्हांच डाक-घरांतील संदेश हातीं येतो आणि

> **तो अहंकारातें दवडूनी। सकल काम सांडोनी।**
> **विचरे विश्व होऊनी। विश्वामाजी ॥**

अयानवमी<br>शके १८५२.

**ऋग्वेदी.**

कै. काशीनाथ विनायक भागवत, बी. ए.



जन्मः—ज्येष्ठ वद्य ५
शके १८१७.

मृत्यूः—आषाढ शुद्ध ७
शके १८५२.

# डाक-घर.

## अंक १ ला.

( **स्थळ:**—माधवाचें घर. )

[ **पात्रें:**—माधव आणि वैद्य. ]

**माधव:**—माझें मन इतकें अस्वस्थ कां बरें व्हावें ? तो येण्यापूर्वीं माझ्या मनाला बरेंवाईट कांहींच वाटत नव्हतें; मन कसें अगदीं निःसंग होतें. पण काय असेल तें असो, तो अवचित् येथें आल्यापासून पाहातों तों त्या लाडक्यानेंच माझें सारें हृदय व्यापून टाकलें आहे. आणि तो जर मला सोडून गेला तर........माझें घर मला शून्य वाटूं लागेल. वैद्यबोवा, तुम्हाला वाटतें कां तो............

**वैद्य:**—जर त्याच्या आयुष्याची दोरी बळकट असेल तर तो दीर्घायु होईल. परंतु आयुर्वेद काय सांगतो म्हणाल तऽऽर............

**माधव:**—अरे देवा ! काय ?

**वैद्य:**—आयुर्वेद म्हणतो, " कफ, वात, सर्दी आणि सांधे धरणें या सर्वांचें मूळ एकच. "

**माधव:**—जाऊं द्या बुवा; तुमचा तो आयुर्वेदाचा भडिमार माझ्या-वर करूं नका. पुरे झाले ते तुमचे शास्त्राचे आधार; माझें मन त्यांनीं अधिकच चिंताग्रस्त होऊन जातें. माझ्याकडून काय होण्यासारखें आहे तें बोला.

**वैद्यः**—( तपकिरीची चिमटी घेऊन ) माधवराव, रोग्याची अतिशय काळजी घेतली पाहिजे.

**माधवः**—अहो, तें खरें; पण कशी तें सांगा ना.

**वैद्यः**—मीं पूर्वींच तुम्हांला नाहीं का सांगितलें, कीं त्याला कांहीं झालें तरी घराच्या बाहेर म्हणून जाऊं द्यावयाचें नाहीं.

**माधवः**—गरीब बिचाऱ्या बाळाला सर्व दिवसभर घरांत कसें राहूं द्यावयाचें ? मोठें कठीण काम आहे !

**वैद्यः**—नाहीं तर दुसरा इलाज काय ? हें शरदृतूंतलें ऊन्ह आणि हा हवेंतील दमटपणा हीं दोन्ही पोटाच्या आजाराला फार वाईट. कारण शास्त्र म्हणतेंच आहे ना मुळीं, कीं " जर शिंका येत असतील किंवा मूर्च्छा येत असेल वा मज्जातंतूंना शीण झाला असेल किंवा कावीळ झाली असेल वा डोळ्यांचा रंग बदलून शिशाच्या रंगासारखा झाला असेल.—"

**माधवः**—माफ करा बुवा. शास्त्राचें अगदीं नांव काढूं नका. हं ! एकंदरींत बिचाऱ्या बाळाला घरांत कोंडून ठेवण्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणतां ? पण याला दुसरी कांहीं तोड नाहीं का ?

**वैद्यः**—छे: ! छे: ! छे: ! अगदीं कांहीं नाहीं. कारण " वारा धो धो वाहात असेल किंवा प्रखर ऊन असेल...."

**माधवः**—वैद्य महाराज, तुम्ही तर कमाल केलीत बुवा ! असें केलें म्हणजे असें होतें व तसें केलें म्हणजे असें होतें हें मला सांगून काय उपयोग ? या शुष्क गोष्टी बाजूला सारून तुम्ही मुख्य मुद्याकडे कां वळत नाहीं ? तुमच्यापुढें शर्थ झाली ! आतां काय करावें, मोठी पंचाईत आली. तुमची उपाययोजना तर बिचाऱ्या बाळाच्या मानानें भारी म्हणजे

भारीच बिकट ! इतक्या वेदनान् इतकें दुखणें पाठीस लागलें आहे तरी त्याची मुद्रा कशी शांत आहे पाहा ! तुमचें तें औषध घेतांना जेव्हां तो तोंड वेडेंवांकडें करतो तेव्हां माझ्या अंतःकरणांत अगदीं चर्र होतें.

**वैद्यः**—जितकें तो तोंड वांकडें करील तितका गुण हटकून येणार म्हणून पक्कें समजा. म्हणूनच भिषग्वर्य च्यवनमुनींनीं म्हटलें आहे, " प्रारंभीं कटु लागणारा उपदेशच जसा शेवटीं खरा ठरतो तसेंच प्रारंभीं कडू लागणारें औषधच शेवटीं रामबाण ठरतें. "

( वैद्यबुवा जातात. बावाजी प्रवेश करतो. )

**माधवः**—पण हा फेरा आलाच. ही पीडा कांहीं केल्या चुकत नाहीं. हा आलाच पाहा बावाजी इकडे.

**बावाजीः**—अहो, असे दूर दूर कां पळतां ? मी तुम्हांला खातों कीं काय ?

**माधवः**—अरे, तसें कांहीं नाहीं. पण तूं म्हणजे एक मुलांचीं माथीं फिरविणारा खवीस पडलास ना ?

**बावाजीः**—पण तुम्ही तर कांहीं कुकुबाळ नाहीं किंवा तुमच्या घरींही मूलबाळ नाहीं. मग एवढे त्रासतां कां ?

**माधवः**—अरे, पण मी घरीं एक मुलगा आणून ठेवला आहे ना !

**बावाजीः**—खरेंच, हें कसें काय झालें बुवा ?

**माधवः**—दत्तकपुत्र घ्यावा म्हणून माझ्या बायकोचा जीव कसा खालींवर होत होता हें तुला माहीत आहेच.

**बावाजीः**—होय, पण ती फार जुनी गोष्ट. तुम्हांला ती कल्पना पसंत नव्हती.

**माधवः**—बावाजी, पैसा मिळविण्यासाठीं मला किती कष्ट करावे लागले हें तुला चांगलें माहीत आहे. इतका खटाटोप करून मिळविलेला पैसा कोठल्या तरी उपरी मुलानें एकदम येऊन उधळून टाकावा—छट्, मला अगदीं नकोशी झाली ही कल्पना—परंतु हें मधुबाळ मात्र अगदीं थेट माझ्या जिव्हाळ्याशीं इतकें बिलगलें आहे, कीं कांहीं विलक्षणच !

**बावाजीः**—अस्सें ! मोठीच आफत् पडली म्हणावयाची ही ! आणि त्याच्याखातर तुमचा सगळा पैका हवा तसा जातो म्हणतां? नशीब त्या पैशांचें कीं तुमच्या हातून सुटतो बिचारा !

**माधवः**—पूर्वीं पैसा मिळविण्याचा मला सारखा हव्यास जडला होता. पैशाकरितां सारखी धडपड केल्यावांचून माझ्या मनाला चैनच पडत नसे मुळीं ! हल्लींसुद्धां मी पैसे मिळवितों, परंतु तो सर्व या लाडक्यासाठीं असें मला जेव्हां वाटतें तेव्हां मात्र पैसा मिळविण्यांत मला अत्यंत आनंद वाटतो.

**बावाजीः**—असो, तें सर्व कांहीं ठीक आहे. परंतु हा मुलगा तुम्हांला कोठें सांपडला ?

**माधवः**—आमच्या कुटुंबाचें माहेर ज्या गांवीं आहे तेथल्या एका तोंडमानल्या गांवबंधूचा तो मुलगा. लहानपणापासून तो आईवेगळा आहे; आणि परवां नुकता त्याचा बाप निवर्तला.

**बावाजीः**—अरेरे ! गरीब बिचारें पोर ! आणि मग तर माझी त्याला विशेषच जरूर आहे.

**माधवः**—वैद्य म्हणतो, त्याच्या इवल्याशा शरीरांतील सर्व इंद्रियें बेबंद झालीं आहेत व तो जगण्याची कांहीं फारशी आशा नाहीं. त्याला वांचविण्याचा एकच उपाय आहे. शरत्कालचा थंड वारा व उन्ह त्याला मुळींच लागूं देतां कामा नये. परंतु तूं एक बागूलबोवा आहेस ना मध्यें ?

तुझ्या या खेळाडूपणापुढें अगदीं हात जोडतों बुवा ! इतकें तुझें वय वाढलें, तरी मुलांना घराबाहेर घेऊन जाऊन त्यांच्याबरोबर खेळण्याचा तुझा नाद कसा सुटत नाहीं हें आश्चर्य आहे.

**बावाजीः**—अरे देवा ! एकूण उन्ह आणि वारा त्याप्रमाणें मी देखील अगदीं वावडा आहें तर ! पण भाई, लहान मुलांना घरांत कसें आनंदानें खेळावयाला लावावयाचें व रीतीनें काम करावयास लावावयाचें ही कलासुद्धां मला थोडी फार साधली आहे. माझा रोजचा कामधंदा उरकला म्हणजे त्या तुझ्या लहानग्या मुलाबरोबर खेळण्यासाठीं मी येत जाईन. ( जातो )

[ अमल प्रवेश करतो. ]

**अमलः**—काका, अहो काका ?

**माधवः**—ओहो ! अमल, तूंच का हांक मारलीस ?

**अमलः**—काका, आंगणाबाहेर मीं मुळींच का जायचें नाहीं ?

**माधवः**—छे ! छे ! माझ्या लाडक्या बाळा, मुळींच नाहीं बरें.

**अमलः**—ती पाहा काकू कशी गाणें म्हणत म्हणत जात्यांत जोंधळे दळीत बसली आहे. अहाहा ! किती गंमत ! ती खार पाहा आपली शेपटी वर पिंजारून कशी बसली आहे; अन् ती धान्याचे बारीक बारीक कण आपल्या चिमुकल्या पंज्यांनीं वेंचीत आहे, व ते कण कर् कर् कर् कर् चावीत आहे, मी तिकडे भर्कन् धांवत गेलों तर नाहीं का चालणार ?

**माधवः**—नको बरें, माझ्या छबकड्या, नको.

**अमलः**—मी खार असतों तर किती बहार झाली असती ! खरोखर मग अतिशयच मौज होती. काका, मला तुम्ही बाहेर कां हिंडूं देत नाहीं ?

**माधवः**—वैद्य म्हणतात बाहेर जाण्यामुळें तुझी प्रकृति बिघडेल.

**अमल:**—वैद्यांना कसें समजलें हो ?

**माधव:**—काय तरी बोलणें हें ! वैद्यांना न समजावयाला काय झालें ? ते एवढीं मोठमोठालीं पुस्तकें वाचतात तीं उगाच वाटतें !

**अमल:**—पुस्तकें वाचून त्यांना सर्व कांहीं समजतें ! आश्चर्य आहे.

**माधव:**—समजतें तर ! तुला हें माहीत नाहीं !

**अमल:**—( सुस्कारा टाकून ) हं ! मीं अगदींच अडाणी तर मग ! मी पुस्तकें वाचीत नाहीं कांहीं नाहीं.

**माधव:**—आतां तूंच विचार कर म्हणजे झालें ! हें पाहा, मोठमोठे जाडे पंडित असतात कीं नाहीं ते अगदीं हुबेहूब तुझ्यासारखे वागतात. ते कधीं घराबाहेर मुळीं जातच नाहींत.

**अमल:**—खरेंच का ते सारा वेळ घरांत बसून काढतात ?

**माधव:**—होय. बाहेर हिंडावयाला त्यांना वेळ कोठचा ? रात्रंदिवस पुस्तकांत डोकीं खुपसून ते बसतात आणि त्यांचें दुसरीकडे कोठें लक्षच जात नाहीं. तर मग छकुल्या, तूं मोठा झालास म्हणजे तूं पंडित होणार ना ? आणि मग तूं केवढेतरी मोठे जाड जाड ग्रंथ वाचूं लागशील व लोकांत तुझी जिकडे तिकडे वहावा होईल व लोक तुला म्हणूं लागतील, ' किती मोठा विद्वान् पुरुष हा ! '

**अमल:**—छे ! छे ! काका, तुमच्या पायाशपथ मी सांगतों, मला कांहीं पंडित व्हावयाचें नाहीं. कध्धीं कध्धीं नाहीं.

**माधव:**—वेडा रे वेडा ! मी जर मोठा विद्वान् झालों असतों तर माझ्या मागची केवढी यातायात चुकली असती !

**अमल:**—छे ! यापेक्षां मी जिकडे तिकडे खूप खूप हिंडेन व जें कांहीं असेल नसेल तें सर्व पाहून घेईन.

**माधवः**—ऐकावें तें नवलच ! सगळें पाहून घेईन म्हणे ! एवढें काय रे तूं पाहाणार ? विशेष पाहाण्याजोगें एवढें काय आहे ?

**अमलः**—तो पाहा आपल्या खिडकींतून खूप दूर अंतरावर उंच डोंगर दिसतो तो—वारंवार मला इच्छा होते, कीं त्या डोंगराच्या पलीकडे लांब लांब सरळ हिंडत हिंडत जावें.

**माधवः**—चल, मूर्ख कोठला ! डोंगराचें शिखर चढून जावयाचें व नंतर लांब लांब हिंडत फिरावयाचें याशिवाय तुला जसा कांहीं आणखी उद्योगच नाहीं. लाडक्या, तूं कांहीं तरी बडबडतो आहेस झालें. आतां मी काय सांगतों तें ऐक. समोर तो डोंगर उंचच्या उंच तटासारखा उभा ठाकला आहे, त्याचा अर्थच हा कीं, त्याच्या पलीकडे कोणालाच जातां येत नाहीं. नाहीं तर पुष्कळ दगड रचून एक प्रचंड रास करण्याचा देवाचा दुसरा काय हेतु असणार बरं ?

**अमलः**—काका, आपल्याला ओलांडून पलीकडे जातां येऊं नये म्हणून का तो डोंगर देवानें निर्माण केला आहे असें तुम्हांला वाटतें ? मला वाटतें कीं, धरणीमातेला कांहीं बोलतां येत नाहीं म्हणून तिनें आपले हात आकाशांत वर केले आहेत व ती खुणा करीत आहे: आणि जे कोणी अतिशय लांब लांब राहातात व खिडकीपाशीं एकटेच बसतात त्यांना ही निशाणी ताबडतोब दिसते. परंतु मला वाटतें, मोठमोठे पंडित....

**माधवः**—असल्या अर्थशून्य गोष्टींत कधींही मन घालीत नाहींत. ते तुझ्यासारखे कांहीं नादिष्ट नाहींत.

**अमलः**—तुम्हांला माहीत आहे का, काल मला कोणी एक अगदीं माझ्यासारखाच नादिष्ट मनुष्य भेटला.

**माधवः**—आं ? खरें कीं काय ? होता तरी कसा तो ?

**अमलः**—त्याच्या खांद्यावर एक लांब बांबूची काठी असून तिच्या वरच्या टोंकाला एक लहानसें गाठोडें अडकविलेलें होतें, डाव्या हातांत एक पितळेची तपेली असून पायांत फाटक्या वहाणा होत्या. खांद्यावर घोंगडी टाकलेली होती. तो त्या कुरणाच्यां पलीकडे सरळ त्या डोंगराच्या बाजूलाच चाललेला होता. मी त्याला हांक मारून विचारलें, “ तूं कोठें जात आहेस ? ” तो म्हणाला, “ कोण जाणे, जातों आपला असाच.” मीं पुनः विचारलें “ कशासाठीं जात आहेस ? तो म्हणाला, मी कांहीं कामधंदा पाहण्यासाठीं जात आहें. ” काका, तुम्हांलाही असेंच कामधंदा पाहण्यासाठीं हिंडावें लागतें का हो ?

**माधवः**—अरे हो, हिंडावें लागतें तर ! त्याशिवाय कसें चालेल ? कामधंद्यापायीं किती तरी लोकांना असें हिंडावें लागतें.

**अमलः**—अहाहा ! किती मजा ! मीसुद्धां किनई त्यांच्यासारखा काम शोधीत हिंडेन.

**माधवः**—समज, तूं खूप शोध शोध शोधलेंस आणि तरीसुद्धां तुला कांहींच काम मिळालें नाहीं, तर मग काय करणार ?

**अमलः**—वा ! मग तर फारच गंमत ! मीं सारखा हिंडत हिंडत जाईन. फाटक्यातुटक्या वहाणा पायांत घालून तो मनुष्य हळू हळू पुढें चालूं लागला; तेव्हां मी त्याजकडे टक लावून पाहात होतों. एका उंबराच्या झाडाखालून मंद मंद वहाणारा स्वच्छ पाण्याचा प्रवाह दिसतांच तो थांबला, व त्यानें आपले हातपाय त्या ओहोळांत धुतले. नंतर त्यानें आपल्या गाठोड्यांतून थोडेंसें चण्याचें पीठ काढलें व थोड्याशा पाण्यांत भिजवून खाऊं लागला. नंतर त्यानें आपलें गाठोडें काठीवर बांधून बांबूची काठी खांद्यावर धरली. आपलें नेसण गुडघ्याच्यावर वेढून घेऊन त्यानें गच्च

बांधून टाकलें व तो ओढा ओलांडून पलीकडे निघून गेला. त्या शांत ओढ्यावर जाऊन त्याच्याप्रमाणें चण्याचें पीठ खाण्यासाठीं तिकडे मला जाऊं देशील का म्हणून मी काकूला केव्हांच विचारून ठेवलें आहे.

**माधवः**—यावर तुझी काकू काय बोलली ?

**अमलः**—काकू म्हणाली, अमल बाळ, तूं चांगला बरा हो म्हणजे मी तुला तिकडे घेऊन जाईन बरें का ? काका, काका, सांगा ना मी केव्हां बरा होईन ?

**माधवः**—आतां हां हां म्हणतां बरा होशील बरें, बाळ.

**अमलः**—खरेंच ! पण मग मी बरा झालों रे झालों कीं थेट दूर दूर निघून जाईन.

**माधवः**—आणि दूर दूर हिंडत तूं जाणार तरी कोठें ?

**अमलः**—पाण्यांतून चालत जाऊन कित्ती कित्ती ओढे नाले ओलांडून मी एकसारखा भिरभिर भिंगरीसारखा चालत राहीन. दिवसाच्या कडक उन्हामुळें उन्हाची झळ सहन न होऊन दरवाजे बंद करून लोक झोपीं गेलेले असतील, आणि मी लांब लांब कोठें तरी कामधंदा शोधण्यासाठीं सारखा वणवण हिंडत राहीन.

**माधवः**—अस्सें ! आधीं प्रकृति तर चांगली सुधारूं दे; मग पुढचें पुढें पाहूं.

**अमलः**—पण काका, मला तुम्ही मोठा पंडित होण्यास सांगणार नाहीं ना ? सांगाल ?

**माधवः**—नाहीं. तर मग तुला दुसरें कोण व्हावेंसें वाटतें ?

**अमलः**—सध्यां नाहीं मला सांगावयाला सुचत. पण पुढें तुम्हांला मी केव्हां तरी सांगेन.

**माधवः**—बरें आहे. पण मी पुनः तुला बजावून सांगतों कीं, जाणाऱ्यायेणाऱ्या अनोळखी लोकांना हांका मारावयाच्या नाहींत व त्यांच्याशीं उगीच बोलतही बसावयाचें नाहीं. समजलें का ?

**अमलः**—पण मला किनई लोकांशीं गप्पा मारण्यांत फार मौज वाटते.

**माधवः**— त्यांनीं तुला पळवून नेलें असतें तर ?

**अमलः**—तर मग मोठी बहारच झाली असती ! पण बाहेर मला कोणी कधींच घेऊन जात नाहीं. त्या सर्वांना वाटतें मीं येथेंच आंत राहावें.

**माधवः**—फार वेळ झाला. मला आतां कामावर गेलेंच पाहिजे. मी निघालोंच–पण माझ्या लाडक्या, तूं घराबाहेर मुळींच जाऊं नको. नाहीं ना जाणार ?

**अमलः**—छेः, अगदीं नाहीं. पण रस्त्याजवळच्या ह्या खोलीमध्यें मला बसूं द्या म्हणजे झालें.

[ माधव जातो. ]

**गवळीः**—दहीं घ्या हो दहींऽऽऽऽअ दहींऽऽऽऽअ घ्या चक्का दहींऽऽऽऽअ.

**अमलः**—दहींविक्या, ए दहींविक्या !

**गवळीः**—मला कां हांका मारतोस ? थोडेंसें दहीं विकत घेतोस का ?

**अमलः**— विकत कसें घेणार ? माझ्याजवळ तर पैसे नाहींत.

**गवळीः**—काय चमत्कारिक मुलगा हा ! उगाचच हांका कशाला मारीत सुटलास मग ? विनाकारण वेळ मात्र गमावला.

**अमलः**—मला तुझ्याबरोबर येतां आलें असतें तर मी आलों असतों.

**गवळीः**—माझ्याबरोबर ?

**अमलः**—हो, तुझ्यांबरोबर. रस्त्यावरून दहीं विकत येतांना लांबून तुझा उंच सूर जेव्हां माझ्या कानावर पडतो तेव्हां मला या घराची आठवण होऊन हुरहुर लागते.

**गवळीः**—( कावड खालीं उतरतो. ) बाळ, तूं येथें काय करीत बसला आहेस ?

**अमलः**—वैद्यबोवा म्हणतात कीं, मला घराबाहेर म्हणून अगदीं जाऊं द्यावयाचें नाहीं, म्हणून मी आपला सर्व दिवसभर येथेंच बसून राहतों, गवळीदादा.

**गवळीः**—अरेरे ! पण बाळ, तुला असें झालें तरी काय ?

**अमलः**—मला नाहीं कळत, मी कांहीं मोठा शिकलेला नाहीं, मग मला काय झालें आहे तें कसें सांगतां येणार ? गवळीदादा, गवळीदादा, तूं कोठून आलास सांग बरें.

**गवळीः**—आमच्या खेडेगांवांतून.

**अमलः**—तुमचें खेडेगांव ! तें पुष्कळ लांब आहे ना ?

**गवळीः**—आमचें खेडें पंचमुरा डोंगराच्या पायथ्यापाशीं शाम्ली नदीच्या तीरावर आहे.

**अमलः**—पंचमुरा डोंगर ! शाम्ली नदी ! नवल तर खरेंच; पण मीं तुझें खेडें पाहिलेलें असावें; कधीं तें मात्र आठवत नाहीं !

**गवळीः**—आमचें गांव तूं पाहिलें आहेस ? त्या डोंगराच्या पाय-थ्याशीं सुद्धां गेला होतास ?

**अमलः**—छेः ! कधींच नाहीं. पण तुझें गांव कधीं तरी पाहिल्या-सारखें वाटतें. तांबड्या मातीच्या रस्त्याच्या बाजूला उंच व जुनाट वड-पिंपळाच्या झाडाखालीं तुझें खेडें वसलेलें आहे, नाहीं काय ?

**गवळीः**—अगदीं बरोबर ओळखलेंस, बाळ.

**अमलः**—आणि डोंगरांच्या उतरणीवर गुरें चरत असतात !

**गवळीः**—मोठें नवल आहे बोवा ! आमच्या गांवांत गाईबैलांचीं खिल्लारें डोंगरांच्या उतरणीवर माळरानांत चरावयास जातात ! अगदीं तंतोतंत बरोबर !

**अमलः**—आणि तुमच्या गांवांतील लाल लुगडीं नेसलेल्या बायका पाणी भरण्यासाठीं नदीवर जातात व डोक्यावर हंडे, घागरी पाण्यानें भरून नेतात.

**गवळीः**—वा रे वा ! किती हुबेहूब वर्णन ! आमच्या गांवांतील गवळणी पाणी भरण्यासाठीं नदीच्या तीरावर जातात खऱ्या, पण प्रत्येक लाल लुगडें नेसलेली असते असें कांहीं नाहीं. पण बाळ, कधीं तरी तूं त्या बाजूला फिरत फिरत गेला असावास खास.

**अमलः**—गवळीदादा, खरोखर मी त्या बाजूला कधींच गेलों नाहीं. पण वैद्यबोवा मला ज्या दिवशीं बाहेर जाण्याची परवानगी देतील त्याच दिवशीं, गवळीदादा, तुम्ही आपल्या गांवीं मला घेऊन जाल ना ?

**गवळीः**—आनंदानें घेऊन जाईन बरें, बाळ.

**अमलः**—आणि तूं मला 'दहीं घ्याहो दहीं' असें तालसुरांत म्हणावयास शिकवशील ना ? व तुझ्यासारखी खांद्यावर कावड घेऊन खूप लांब लांब रस्त्यावरून दहीं विकीत कसें जावयाचें हें तूं मला सांगशील ना ?

**गवळीः**—माझ्या लाडक्या, अरे, असें कधीं झालंय थोडेंच ! तुला दहीं विकून काय करावयाचें आहे ? भलतेंच कांहीं तरी. तूं मोठीं पुस्तकें वाचणार व बडा पंडित होणार !

**अमलः**—छे ! छे ! आपण नाहीं बोवा पंडित होणार. मी तुझ्यासारखा गवळी होईन आणि दह्याचीं मडकीं घेऊन खेड्यांतून लाल लाल रस्त्यानें वडाच्या झाडाजवळ जाईन. घरोघर मी दहीं विकीन. अहाहा ! किती पण छान तुझा तो सूर—दहीं घ्या हो दहींऽऽऽऽअ दहींऽऽऽऽअ. घ्या चक्का दहींऽऽऽऽअ तुझा तो उंच लांब सूर कसा काढावयाचा तें शिकव ना ?

**गवळीः**—वाहवा ! तूं तो सूर काढण्यास शिकणार ! किती खुळी कल्पना !

**अमलः**—शिकव ना रे. तो सूर माझ्या कानाला किती गोड लागतो. त्या रस्त्याच्या वळणावर तूं जेव्हां दहीं घ्या हो दहींऽऽऽऽअ असें ओरडत जातोस व तुझा तो घुमणारा सूर त्या झाडांमधून माझ्या कानांवर पडतो तेव्हां मला कसें चमत्कारिक वाटतें तें कांहीं सांगतां येत नाहीं. आकाशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत घुमणारा घारीचा खुरुऽऽऽऽऊ असा कर्कश आवाज ऐकतांना मला जसें वाटतें तसें वाटतें.

**गवळीः**—बाळ, तुला थोडें दहीं पाहिजे का ? घे बाळ, थोडें घे.

**अमलः**—पण माझ्याजवळ पैसे नाहींत ते ?

**गवळीः**—छे ! छे ! छे ! पैशाची गोष्टच काढूं नको. तुझ्यापुढें पैशाची काय किंमत ! तूं माझ्याजवळून थोडें दहीं घेतलेंस तर मला किती आनंद वाटेल !

**अमलः**—मीं तुझी उगाच बरीच रखडपट्टी केली कांरे ?

**गवळीः**—अंः ! मुळींच नाहीं. माझें कांहींच नुकसान झालें नाहीं. उलट दहीं विकतां विकतांना आनंद कसा होतो हें तुझ्यापासून मला समजलें. [ गवळी जातो ]

**अमलः**—( गवळ्यासारखा आवाज काढून ) दहीं घ्या हो दहींऽऽऽऽअ, गोड दहींऽऽऽऽअ, घ्या चक्का दहींऽऽऽऽअ. गौळवाड्यांतलें दहींऽऽऽऽअ, शाम्लीकांठच्या डोंगरी गांवचें दहींऽऽऽऽअ. गोड दहींऽऽऽऽअ! झुंजुमुंजु होतांच गवळणी गाईना रांगेनें उभ्या करतात व चुर्र, चुर्र, चुर्र, धार काढतात आणि सांज झाली म्हणजे दहीं विरजतात. दहीं घ्या हो दहींऽऽऽऽअ, गोड दहींऽऽऽऽअ. ओहो! ओहो! तो पाहा नाईक फिरतीवर निघाला. नाईकदादा, अहो नाईकदादा, जरा इकडे याना. माझ्याशीं एक दोन शब्द बोलाल तर खरे.

**नाईकः**—ही काय आरडाओरड मांडली आहेस? आमच्यासारख्यांची सुद्धां तुला भीति वाटूं नये अँ!

**अमलः**—छे. कां म्हणून?

**नाईकः**—समज, तुला मीं पकडून नेला तर?

**अमलः**—कोठें घेऊन जाशील! त्या डोंगरांच्या थेट पलीकडे लांब लांब नेणार?

**नाईकः**—समज, मी तुला थेट राजाकडे घेऊन गेलों तर?

**अमलः**—राजाकडे! हो कां? खरेंच कां जाल घेऊन? पण वैद्यबोवा कांहीं मला बाहेर जाऊं द्यावयाचे नाहींत. कोणालाही मला घेऊन जातां यावयाचें नाहीं. सर्व दिवसभर मला येथेंच राहिलें पाहिजे.

**नाईकः**—वैद्यबोवा तुला जाऊं द्यावयाचे नाहींत! गरीब बिचारा! आतां मला समजलें! तुझें तोंड फटफटीत पडलें आहे. तुझ्या डोळ्याभोंवतालचा भाग काळवंडला आहे. तुझ्या चिमुकल्या हातांवरील शिरा वरती आल्या आहेत.

**अमलः**—नाईकदादा, तुम्ही आपला तास वाजवीत नाहीं कुठें?

**नाईकः**—अजून वेळ झाली नाहीं.

**अमलः**—काय गंमत आहे पाहा ! कांहींजण म्हणतात अजून वेळ झाली नाहीं, आणि कांहींजण म्हणतात वेळ निघून गेली ! पण तुम्ही आपला तास वाजविलात रे वाजविलात, कीं मग मात्र खात्रीनें तुमची वेळ झाली असें समजावयाचें नाहीं का ?

**नाईकः**—असें कसें चालेल ? जेव्हां वेळ होते तेव्हांच मी तास वाजवितों.

**अमलः**—तुमच्या तासाच्या ठोक्यांचा दुमदुमणारा नाद मला किती आवडतो म्हणून सांगूं ! दुपारच्या वेळीं आमचें जेवणखाण आटोपल्या-वर जेव्हां आमचे काका कामावर जातात आणि आत्या रामायण वाचतां वाचतां झोंपी जाते आणि आंगणांत पडवीच्या बाजूला आमचा मोत्या कुत्रा आपल्या वेटाळलेल्या शेपटींत तोंड खुपसून निजतो तेव्हां तुमच्या तासाचे डांग, डांग, डांग असे ठोके पडतात. मला सांगा पाहूं तुम्ही आपला तास कां वाजवितां ?

**नाईकः**—माझ्या तासाचा आवाज लोकांना असें सांगतो कीं, काळ कोणासाठींही थांबत नाहीं, पण एकसारखा चाललेला आहे.

**अमलः**—कोठें ? काळ कोठच्या देशाला चालला, नाईकदादा ?

**नाईकः**—तें कोणालाच कळत नाहीं.

**अमलः**—मग मला वाटतें तिकडे अजूनपर्यंत कोणी गेलेलें नसावें ! कोणालाही ठाऊक नसलेल्या त्या देशाला पांखरासारखें भुरदिशीं काळा-बरोबर आपणही निघून जावें अशी मला फार इच्छा झाली आहे.

**नाईकः**—प्रत्येकाला तिकडे कधीं तरी एकदां जावयाचेंच आहे; समजलें, बाळ ?

अमलः—मलासुद्धां ?

नाईकः—हो, हो, तुला सुद्धां !

अमलः—पण वैद्यबुवा मला मुळींच जाऊं देणार नाहींत.

नाईकः—एक दिवस वैद्यराज स्वतःच हात धरून तुला तिकडे घेऊन जातील कदाचित् !

अमलः—छे ! शक्यच नाहीं. तुम्हांला त्यांचा स्वभाव माहीत नाहीं. मी फक्त घरांतच राहिलों पाहिजे अशी त्यांची सक्त ताकीद आहे.

नाईकः—अं ! त्या वैद्यबोवांची काय कथा ! त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ वैद्यराज येतात व आपल्याला घेऊन जातात.

अमलः—मला नेण्यासाठीं हे मोठे वैद्यराज कधीं येतील ? येथल्या येथेंच खिळून राहाणें माझ्या जिवाला नकोसें झालें आहे.

नाईक—माझ्या बाळा, असें बोलूं नको हो.

अमलः—तसें कांहीं नाहीं हो. मला ज्या खोलींत ठेवलेला आहे तेथेंच मी आहें. मी थोडीसुद्धां इकडे तिकडे हालचाल करीत नाहीं. पण तुमच्या तासाचा डांग, डांग, डांग असा घणघणाट सुरू झाला म्हणजे तो दुमदुमणारा नाद माझ्या अंतःकरणांत भिनून जातो. एक गोष्ट विचारूं का, नाईकदादा ?

नाईकः—काय ? माझ्या लाडक्या काय विचारणार तूं ?

अमलः—हें पाहा, त्या पलीकडच्या टोलेजंग बंगल्यांत काय धामधूम चाललेली आहे ? तेथें एक निशाण उभारलेलें आहे व तें उंच फडकत आहे. व लोकांची ये-जा सारखी सुरू आहे. सांगा तें काय आहे तें ?

नाईक—तेथें ना ? अरे तें आमचें नवें डाक-घर.

**अमलः**—डाक-घर? कोणाचें?

**नाईकः**—कोणाचें म्हणजे! अरे, राजाचें. दुसरें कोणाचें?

**अमलः**—येथल्या डाकघरांत राजाकडून पत्रें येतात काय?

**नाईकः**—अलबत. एखाद्या फक्कड दिवशीं तुला देखील एखादें पत्र येईल.

**अमलः**—मला पत्र येईल? पण मी तर एवढासा मुलगा!

**नाईकः**—लहान मुलांना राजा छानदार छोटेखानी चिठ्या पाठवितो.

**अमलः**—हा! हा! किती पण मौज. मला पत्र केव्हां येईल तर मग? तो माझ्या नांवावर पत्र लिहील हें तुला कसें माहीत?

**नाईकः**—नाहीं तर येथें बरोबर तुझ्या खिडकीसमोरच सोनेरी निशाण फडकवून डाकघर उघडण्याचें काय कारण?

**अमलः**—राजाचें पत्र आलें म्हणजे तें मला आणून कोण देईल पण?

**नाईकः**—राजाचे पुष्कळ डाकवाले आहेत. गोल चकचकीत बिल्ले छातीवर अडकवून इकडे तिकडे जलदीनें चालतांना तूं त्यांना पाहात नाहींस का?

**अमलः**—बरें, ते जातात तरी कोठें?

**नाईकः**—कोठें जातात! सर्व देशभर दारोदार.

**अमलः**—मी मोठा झालों म्हणजे राजाचा डाकवाला होणार.

**नाईकः**—अस्सं! अस्सं! डाकवाला होणार तर! उन्ह असो, पाऊस असो, गरीब असो, श्रीमंत असो, आपलें घरोघर पत्रें देत भिर-भिर फिरावयाचें—काम तर बडें खरें!

**अमलः**—तेंच काम मला अत्यंत आवडेल. असें हंसावयाला काय झालें तुम्हांला? हो, तुमचें कामसुद्धां मोठेंच आहे तर. दुपारच्या

रखरखीत वेळीं जेव्हां जिकडे तिकडे शांतता पसरते तेव्हां तुमच्या तासाचे डांग, डांग, डांग, असे ठोके घुमूं लागतात. आणि जेव्हां कधीं कधीं मी एकाएकीं रात्रीं जागा होऊन पाहातों तों आमचा दिवा मालविलेला असतो; अशा वेळीं काळोखामधून तुमच्या हळू हळू वाजणाऱ्या तासाचे डांग, डिंग, डांग, डिंग, असे घुमणारे शब्द हेलकावत हेलकावत माझ्या कानावर पडतात.

**नाईकः**—ते पाहा पाटीलबोवा इकडेच येत आहेत! मला येथून झटकलेंच पाहिजे आतां. रिकामटेकड्या गप्पा मारतांना त्यांनीं मला जर पकडलें तर अगदीं गहजब करतील माझ्यावर.

**अमलः**—पाटीलबोवा? कोठें आहेत ते पाहूं.

**नाईक**—त्या रस्त्याच्या अगदीं टोंकाला; ती पाहा भली थोरली ताडपत्री छत्री ठुमकत आहे ती! तीच त्यांची स्वारी.

**अमलः**—मला वाटतें राजानें त्याला आपल्या या गांवचा पाटील नेमलें आहे?

**नाईक**—त्याला नेमला? छे! मुळींच नाहीं. बोलूनचालून उठल्या गांवचा पाटील तो. दुसऱ्याची मर्जी नकोसें करण्यांत हे इतके तरबेज आहेत कीं, प्रत्येकाला त्यांची भीतिच वाटते. त्यांच्याच माळेंतले मणि आहेत अशा लोकांना दुसऱ्याला त्रास देणें हा एक खेळच वाटत असतो. मला येथून झटकन् गेलेंच पाहिजे आतां! कामाचा खोळंबा करून चालणार नाहीं! समजलें का? उद्यां सकाळीं पुनः मी येतोंच व गांवची सर्व बित्तंबातमी तुला सांगतों. [ जातो. ]

**अमलः**—रोजच्या रोज राजाकडून पत्र आलें तर किती मजा होईल! मी तें खिडकीपाशीं बसून वाचीन. पण खरेंच! मला लिहिलेला मज-

कूर वाचत्तां कोठें येत आहे ! तीं पत्रें मला कोण बरें वाचून दाखवील ? आत्या आपलें रामायण वाचते, तिला राजाचें लिहिणें कदाचित् कळेल. जर कोणीच वाचून दाखविलीं नाहींत तर मग सध्यां तीं जपून ठेवून मोठा झालों म्हणजे वाचीन. पण डाकवाल्यास माझा पत्ता सांपडला नाहीं तर ? पाटीलबोवा, अहो पाटीलबोवा, मी तुमच्याशीं जरासा बोलूं का ?

**पाटीलः**—भर रस्त्यावर माझ्या नांवानें कोण बरें ओरडत सुटला आहे ? अरे तूं का, तूंच कां क्षुद्र माकडा ?

**अमलः**—तुम्ही तर या गांवचे पाटील. सर्व गांवकरी तुम्हाला बचकतात.

**पाटीलः**—( खुलल्यासारखा दिसून ) अलबत् वचकणारच !

**अमलः**—राजाचे डाकवाले तुम्ही काय सांगतां तें ऐकतात का ?

**पाटीलः**—त्यांनीं ऐकलेंच पाहिजे. पाहूं बरें कोण गुलाम—

**अमलः**—डाकवाल्याला सांगाल का, कीं खिडकीपाशीं बसतो तो अमल म्हणून ?

**पाटीलः**—सांगून काय करावयाचें आहे !

**अमलः**—समजा मला जर एखादें पत्र आलें तर ?

**पाटीलः**—तुला पत्र ! तुला पत्र कोण लिहावयाला बसलंय बुवा !

**अमलः**—राजानें लिहिलें तर !

**पाटीलः**—ह्यः ! ह्यः ! ह्यः ! काय विलक्षण आहे ! हंः ! हंः ! काय म्हणे राजा लिहिणार ! जसा काय राजाचा जिवलग मित्रच अँ ! तुझी बरेच दिवसांत भेट न झाल्यामुळें राजा तुझ्यासाठीं झुरणीस लागला असेल हो अगदीं ! उद्यांपर्यंत थांब मग तुला आपलें पत्र मिळेल.

**अमलः**—सांगा, पाटीलबोवा, तुम्ही माझ्याशीं असे चढ्या सुरांत कां बोलतां ? तुम्ही माझ्यावर रागावलांत का ?

**पाटीलः**—भले शाबास ! काय म्हणे रागावलांत का ? तूं राजाला पत्र लिहिणार नाहीं का ? माधव अलीकडे फारच शेंफारून गेला आहे. त्यानें थोडी फार पुंजी करून ठेविली आहे. तेव्हां उठल्यासुठल्या राजे-रजवाड्यांशिवाय त्याच्या माणसांना दुसरी बात नाहीं. माझ्या एकदां तो तावडींत तर सांपडूं दे म्हणजे दाखवितों इंगा ! राजाचें पत्र तुझ्या घरीं पोहोंचतें करण्याची मी व्यवस्था करतों बरें–खरोखर मी पाठवून देतोंच.

**अमलः**—नको, नको. अहो, तुम्ही कशाला विनाकारण तसदी घेतां ?

**पाटीलः**—आणि सांग कां घेऊं नये ? मी तुझ्याविषयीं सर्व कांहीं राजाला सांगेन, म्हणजे मग कांहीं फार उशीर लागणार नाहीं. त्याचा एखादा हुजऱ्या लवकरच तुझा तपास करावयाला येईल. माधवाच्या उद्धटपणाची अगदीं कमाल झाली. राजाच्या एकदां हें कानावर गेलें तरच त्याचें डोकें कांहीं ठिकाणावर येईल. [ पाटील जातो. ]

**अमलः**—तिकडून कोण चाललंय तें ? तुझ्या पायांतील तोरडया कशा रुमझुम वाजताहेत ! थांब, थांब, जरा थांब. थोडी थांबशील कीं नाहीं ?

( एक मुलगी प्रवेश करते. )

**मुलगीः**—एक क्षणसुद्धां मला सवड नाहीं. अगोदरच उशीर झाला आहे.

**अमलः**—अस्सें, तुझ्या मनांत थांबावयाचें नाहीं असें दिसतें. मलाही आतां येथें आणखी राहाण्याची इच्छा नाहीं.

**मुलगीः**—तुला पाहिलं कीं पहांटेच्या ताऱ्याची आठवण होते अगदीं ! होतं तरी काय तुला ?

**अमलः**—मला तें ठाऊक नाहीं; वैद्यबोवा मला बाहेर जाऊं देत नाहींत.

**मुलगीः**—अग बाई ! जाऊं नको हो तर मग ! वैद्यबोवांचं ऐकावं बरं कां ! अन् हट्ट करशील तर लोक तुझ्यावर रागावतील. मला वाटतें बाहेर टक लावीत राहून तूं कंटाळून गेला असशील. जरा ही खिडकी बंद करून घेऊं दे.

**अमलः**—छे, नको. हीच एक फक्त उघडी आहे. बाकीच्या सर्व बंद केलेल्या आहेत. पण तूं कोण आहेस तें मला सांगतेस का ? तूं कांहीं ओळखीची दिसत नाहींस.

**मुलगीः**—माझं नांव सुधा.

**अमलः**—सुधा कोणती ?

**सुधाः**—तुला माहीत नाहीं ? येथल्या माळ्याची मुलगी.

**अमलः**—तूं काय काम करतेस ?

**सुधाः**—मी परडींत फुलं गोळा करतें.

**अमलः**—अहाहा ! फुलें वेंचण्याचें काम करतेस. तरीच तुझीं पावलें इतक्या उल्हासानें पडतात, व तुझ्या तोरड्या तुझ्या चालण्याच्या नादावर आनंदानें रुमझुम नाचूं लागतात. मला सुद्धां बाहेर येतां येतें तर काय बहार उडाली असती ! अगदीं नजरेपार शेंड्यावरच्या फांदीवर फुललेलीं फुलें खुडून मीं तुला दिलीं असतीं.

**सुधाः**—खरंच का ? माझ्या इतकी तुला फुलांची माहिती आहे का ?

**अमलः**—होय, मला अगदीं तुझ्याइतकी माहिती आहे. गोष्टींत नाहीं का सांगितलें, कीं एक होता चंपा आणि त्याला होते सातजण भाऊ म्हणून ! मला सर्व माहिती आहे. त्यांनीं मला एकदां बाहेर जाऊं दिलें रे दिलें कीं, मी थेट अशा दाट जंगलांत जाईन कीं, तेथें कोणाला वाट देखील सांपडावयाची नाहीं. आणि जेथें बारीक डहाळीच्या टोंकावर बसून

एखादें पांखरूं फुलांत मध चाखीत गुणगुणत असेल अशा ठिकाणीं मी चंपा होऊन फुलेन. तूं माझी ताई परूळ होशील का ?

**सुधाः**—अगदींच बाई तूं वेडा ! मी रे कशी परूळ होणार ? मी सुधा आणि माझी आई माळीण शशिकला नाहीं का ? दररोज़ मला किती किती हार गुंफावे लागतात. तुझ्यासारखा मला ज़र इथं रिकामा वेळ घालवावयाला मिळाला असता तर मग काय माझी मजाच झाली असती !

**अमलः**—मग सर्व दिवसभर तूं काय केलें असतेंस ?

**सुधाः**—माझ्या खेळांतली नवरी माझी बिनी बाहुली न् मनी मांजरी यांच्याबरोबर मी किती किती गंमत केली असती ! आणि—पण हें बघ भारीच उशीर झाला आतां. आतां मला थांबतां उपयोगी नाहीं. नाहीं तर मला एक सुद्धां फूल मिळायचें नाहीं.

**अमलः**—थांब ना ग ज़रा; किती गंमत वाटत होती मला !

**सुधाः**—वा छान........आतां हट्ट करूं नकोस बरं का. शहाणा कसा तूं; मुकाट्यानें बस आणि फुलं घेऊन घरीं परत जातांना मी येईन आणि तुझ्याशीं बोलेन.

**अमलः**—आणि तेव्हां तूं मला एक फूल देशील ना ?

**सुधाः**—छे, मी कशी देणार ? त्याला किंमत द्यावी लागते.

**अमलः**—मी मोठा झालों म्हणजे देईन. त्या ओहोळाजवळच्या पलीकडच्या बाजूला मी कामधंदा शोधण्यास जाण्यापूर्वींच देईन.

**सुधाः**—बरं देईन मग झालं ना ?

**अमलः**—आणि फुलें वेचून झालीं कीं तूं परत येणार ना ?

**सुधाः**—हो येईनच.

**अमलः**—खरंच तूं येशील ना ?

**सुधाः**—हो, मी नक्की नक्की येईन.

**अमलः**—मला तूं विसरणार नाहींस ? माझं नांव अमल, नीट ध्यानांत ठेव.

**सुधाः**—मी तुला कध्धीं कध्धीं विसरणार नाहीं. तुला कळेलच लवकर. [ सुधा जाते. ]

( लहान मुलांचा एक मेळा प्रवेश करितो. )

**अमलः**—अरे, सर्वजण तुम्ही भुरु भुरु कोठें रे चाललांत ? थोडा वेळ येथें थांबा ना !

**एक मुलगाः**—आम्ही खेळायला चाललों.

**अमलः**—तुम्ही कसला खेळ खेळणार ?

**एक मुलगाः**—आम्ही शेतकरी होऊन नांगर नांगर खेळणार.

**तिसरा मुलगाः**—( काठी दाखवून ) हा पाहा आमचा नांगर.

**दुसरा मुलगाः**—आम्ही दोघेजण रंगी शिंगी बैलाची जोडी बरें का !

**अमलः**—आणि तुम्ही सर्व दिवसभर खेळत राहणार ?

**एक मुलगाः**—हो. हो. सर्व दिवसभर.

**अमलः**—आणि संध्याकाळीं नदी कांठच्या रस्त्यानें तुम्हीं घरीं परत जाल ना ?

**एक मुलगाः**—हो.

**अमलः**—तुम्ही घरीं जातांनां आमच्या घरावरून जातां काय ?

**एक मुलगाः**—बाहेर ये व आमच्या बरोबर खेळावयाला लाग. चल ये लवकर.

**अमलः**—वैद्यबोवा नाहीं मला बाहेर जाऊं देणार.

**एक मुलगाः**—कसला आलाय वैद्य ! अँः अरे, वैद्याचें म्हणणें कां तूं जुमानतोस ? चल जाऊं आपण. फार उशीर होत आहे.

**अमलः**—जाऊं नका. या खिडकीजवळच रस्त्यावर खेळा ना ! म्हणजे तुमचा खेळ मला पाहतां येईल.

**एक मुलगाः**—आम्ही येथें कसला खेळ खेळणार ?

**अमलः**—इकडे तिकडे पडलेलीं हीं पाहा माझीं खेळणीं तर आहेत ! हीं घ्या अन् खेळा ना ! या सर्व इकडे. हीं घ्या तुम्हाला खेळणीं. मी एकटा कसा खेळणार ? खेळणीं धूळ खाऊन बिघडून चाललीं आहेत आणि त्यांचा मला कांहींच उपयोग होत नाहीं.

**मुलेंः**—हा ! हा ! किती गंमत ! किती छानदार रंगीत खेळणीं हीं ! हें पाहा तारूं, तिकडे पाहा ती जटाईमावशी. हा ! हा ! किती मौज ? हा पाहा ऐटबाज शिपाई दिसतो ना रे ? आणि तूं तीं सर्व आम्हांला देऊन टाकणार ना ? खरोखर तुझी आडकाठी नाहीं ना ?

**अमलः**—छे; मुळींच नाहीं; घ्या तुम्हीं.

**एक मुलगाः**—तुला तीं परत नकोत ?

**अमलः**—छे; मुळींच नकोत. मला नाहीं तीं लागणार.

**एक मुलगाः**—पण याबद्दल तुला कोणी रागें भरणार नाहीं ना ?

**अमलः**—मला नाहीं कोणी रागें भरणार. पण दररोज सकाळीं आमच्या दरवाज्यासमोर हीं खेळणीं घेऊन घटकाभर खेळाल ना ? हीं जुनीं झालीं म्हणजे मी तुम्हांला नवीं नवीं सुंदर खेळणीं आणून देईन.

**एक मुलगाः**—हो, हो, आम्ही येऊंच. हें बघ, तूं हे शिपाई रांगेनें उभे करून ठेव पाहूं. आपण लढाईचा खेळ खेळूं या. बंदूक कोठची आणावी बरें ? अरे, इकडे बघ. ही बोरूची कांडी बंदूक म्हणून चांगली शोभेल नाहीं ? पण अरे, तुला तर एव्हांच झोंप येऊं लागली.

**अमलः**—मला वाटतें मला झोंपेची गुंगी आली आहे, काय होतें तें सांगतां येत नाहीं; पण कधीं कधीं मला असें होतें. मी बराच वेळ बसून बसून अगदीं कंटाळून गेलों आहें. माझी पाठ दुखते.

**एक मुलगाः**—आतां कोठें दुपार होत आहे. तुझ्या डोळ्यांवर झोंपेची झांपड या वेळीं कशी आली ? ऐक ! पहिल्या प्रहराचा तास वाजूं लागला.

**अमलः**—खरेंच डांग, डांग, डांग तो तास मला अंगाई गीत गाऊन निजवीत आहे.

**एक मुलगाः**—आपण जाऊं या तर मग, उद्यां सकाळीं आपण पुनः येऊं.

**अमलः**—तुम्ही जाण्यापूर्वीं मला तुम्हांला कांहीं विचारावयाचें आहे. तुम्ही नेहमीं बाहेर हिंडतां फिरतां; तुम्हाला राजाचे डाकवाले माहीत आहेत का ?

**मुलें:**—हो, हो, चांगले माहीत आहेत.

**अमलः**—कोण आहेत ते ? मला त्यांचीं नांवें सांगा पाहूं.

**एक मुलगाः**—एकाचें नांव पांडू.

**दुसरा मुलगाः**—दुसरा शरद्.

**तिसरा मुलगाः**—असे किती तरी आहेत.

**अमल:**—मला जर एखादें पत्र आलें तर ते मला ओळखतील असें तुम्हांला वाटतें काय ?

**एक मुलगा:**—जर पत्रावर तुझें नांव असेल तर खात्रीनें ते तुला शोधून काढतील.

**अमल:**—उद्यां सकाळीं तुम्हीं सर्वजण जमून याल तेव्हां येतांना त्यापैकीं एकाला तुम्हीं आपल्याबरोबर घेऊन याल का ? म्हणजे तो मला ओळखील.

**एक मुलगा:**—हो, तुझी इच्छा असल्यास घेऊन येऊं.

[ पडदा पडतो. ]

---

# अंक २ रा.

( अमल बिछान्यावर निजला आहे. )

**अमलः**—काका, आज मला खिडकीपाशींही नाहीं का जाऊं द्यावयाचें ? तेवढयालाही वैद्यबोवांची हरकत आहे ?

**माधवः**—होय, सोनुल्या ! हें बघ, दिवसभर तेथें बसूनबसून तूं आपली प्रकृति किती बरें बिघडवून घेतली आहेस !

**अमलः**—छे, कांहीं तरीच ! त्यामुळें माझी प्रकृति अधिक खराब झाली कीं नाहीं कोण जाणे ! पण तेथें बसलें कीं मला फार बरें वाटतें !

**माधवः**—नाहीं रे, कांहीं तरीच तुझें ! त्या खिडकीपाशीं बसून पोर असो, थोर असो, इकडून जाणाऱ्यायेणाऱ्या सर्व लोकांशीं तूं गप्पी करतोस. ओसरीवर जसा काय त्यांचा बाजार भरलेला असतो. असल्या गलबल्यानें जीव अगदीं हैराण व्हावयाचा, बघ तुझें तोंड कसें उतरून गेलें आहे तें.

**अमलः**—काका, माझा बावाजी येईल तेव्हां मी खिडकीजवळ त्याला दिसलों नाहीं तर तो पुढें निघून जाईल.

**माधवः**—तुझा बावाजी आहे तरी कोण तो ?

**अमलः**—तो आला कीं पाहिलेल्या अनेक प्रदेशांच्या मनोरंजक गोष्टी मला सांगतो. त्याचें बोलणें सारखें ऐकत राहावेंसें वाटतें.

**माधवः**—असें कसें ? मला एकाही बावाजीची माहिती नाहीं.

**अमलः**—साधारण या वेळेला तो येथें येतो. पायां पडतों काका, पण माझ्याशीं गोष्टी सांगावयाला त्याला एक घटकाभर तरी आंत बोलवा.

( बावाजी प्रवेश करतो. )

**अमलः**—वा ! बरे आलांत. बावाजी, माझ्या बिछान्याजवळ असे इकडे या.

**माधवः**—आँ !........पण हा तर–

**बावाजीः**—( सारखे डोळे मिचकावून ) मी बावाजी आहें.

**माधवः**—तूं कोण नाहींस याबद्दल माझा कांहीं तर्कच चालत नाहीं.

**अमलः**—ह्या खेपेस तुम्ही कोणत्या देशाला जाऊन आलांत बावाजी ?

**बावाजीः**—पोपटांच्या बेटावर ! आतांच मी परत आलों.

**माधवः**—पोपटांचें बेट !

**बावाजीः**—त्यांत कसलं एवढं नवल वाटलं तुला ! मी कांहीं तुझ्यासारखा नाहीं. प्रवासाला एक कवडीदेखील लागत नाहीं. मन मानेल तेथें मी पायींच भटकतों.

**अमलः**—( टाळ्या वाजवून ) तुझी किती मजा आहे ! मी बरा झालों म्हणजे मला आपला सोबती म्हणून बरोबर घेऊन जाण्याचें तूं वचन दिलेंस तें लक्षांत आहे ना ?

**बावाजीः**—आहे तर, आणि फिरस्त्याचें असें एक एक गुपित तुला शिकवीन कीं, दर्या असो, जंगल असो, कीं पहाड असो, कोठेंच तुला आडकाठी होणार नाहीं.

**माधवः**—हें काय गुऱ्हाळ लावलें आहेस बुवा ?

**बावाजीः**—बेटा अमल, दर्या असो डोंगर असो, मला कोठेंही मान वांकविण्याचा प्रसंग येत नाहीं. पण हे तुझे काकासाहेब व वैद्यबुवा यांची जोडी जमली म्हणजे माझे सर्व जादुमंत्र फुकट जाऊन मला त्यांच्या समोर हात टेकण्याची पाळी येते.

**अमलः**—त्याची काळजी नको. काका वैद्यबोवांना सांगणार नाहींत व मी शांतपणें पडून राहण्याचें कबूल करतों. पण माझी प्रकृति चांगली होतां क्षणींच मी बावाजीबरोबर जाणार आणि मग समुद्र असो, डोंगर असो, कीं धो धो वहाणारा ओढा असो, माझ्या मार्गांत मला कांहींही अडविणार नाहीं.

**माधवः**—नको, नको, माझ्या सोन्या बाळा, 'मी जाणार, मी जाणार' हें एकच पालुपद सारखें गात राहूं नको रे ! असें तुला म्हणतांना ऐकून माझ्या अंतःकरणांत अतिशय कालवाकालव होते रे !

**अमलः**—बावाजी, तें पोपटांचें बेट कशासारखें आहे तें मला सांगा पाहूं.

**बावाजीः**—तो एक अजब देश आहे. तेथें एकजात पक्ष्यांची वस्ती आहे. तेथें औषधालाही माणूस नाहीं, आणि पक्षी आपल्यासारखे बोलतचालत नाहींत. ते आपले नुसते गातात न् उडतात, गातात न् उडतात.

**अमलः**—ओहोहो ! काय बहारीचा देश ! आणि तो एखाद्या समुद्रानजीक असेल ?

**बावाजीः**—होय, तो समुद्रावरच आहे.

**अमलः**—आणि हिरवेगार डोंगर आहेत ना ?

**बावाजीः**—हो तर, हिरव्या हिरव्या डोंगरामध्येंच पक्षी वसती करतात. आणि दिवस मावळतांना डोंगरपठारावर लाली चढत असते तेव्हां हिरवेचार पंख पसरून पक्ष्यांचे थवेच्या थवे आपल्या घरट्याकडे उडत जातात.

**अमलः**—आणि तेथें धबधबे पण आहेत ?

**बावाजीः**—माझ्या सोन्या असावयाचेच ! धबधबे नाहींत असा एकही डोंगर कोठें सांपडावयाचा नाहीं. अहाहा ! कोणाला वाटेल हिरेच

जसे कांहीं वितळले आहेत. आणि बाळ, ते नाचतात किती मजेदार ! जेव्हां ते गारगोट्यांवरून खळखळत समुद्राकडे जातात तेव्हां त्या गारगोट्यांनाही ते मंजुळ गावयाला लावतात. वैद्य काय, वैद्याचा बाप आला तरी ते एक क्षणभर थांबणार नाहींत. मला एक निवळ मनुष्य, एक केवळ बिनपंखांचा क्षुद्र प्राणी लेखून पक्षी माझ्याकडे पाहूं लागले. मी त्यांच्या खिजगणतींतच कसा तो नव्हतों. तसें नसतें तर मी त्यांच्या गजबजलेल्या घरट्यांमध्यें स्वतःसाठींही एक पर्णकुटिका बांधली असती. आणि समुद्राच्या लाटा मोजीत मोजीत आयुष्याचे दिवस घालविले असते.

**अमलः**—मी पक्षी असतों तर किती छान झालें असतें ! मग—

**बावाजीः**—पण मग जरा कठीणच प्रसंग पडता; कारण माझ्या असें कानावर आलें आहे कीं, मोठा झाल्यावर दहींविक्या होण्याबद्दल तूं गवळ्याजवळ नक्की ठरवून टाकलें आहेस. मला वाटतें अशा तऱ्हेच्या धंद्याला पक्ष्यांमध्यें तेजी येणार नाहीं. तूं भयंकर नुकसान मात्र करून घेशील.

**माधवः**—खरोखर, हें प्रकरण आतां वहावत चाललें. तुम्हां दोघांच्या बोलण्यापायीं माझें डोकें मात्र विनाकारण फिरून जाणार. मी आपला जातों कसा............

**अमलः**—गवळी आलाय् का हो काका ?

**माधवः**—कसा नाहीं येणार ? तुझ्या आवडत्या फकीरासाठीं पोपटांच्या बेटावर घरट्याघरट्यांतून निरोप पोहोंचविण्याची कटकट त्याच्यामागें थोडीच आहे ? पण त्यानें तुझ्यासाठीं एक दह्याचा माठ ठेविला आहे. व तो जातांना म्हणाला कीं, गांवंढ्यावर पुतणीच्या

लग्नाच्या धामधुमींत मी गुंतलों आहें. व कामलीपाऱ्याहून वाजंत्री बोलाविण्यासाठीं मला जावयाचें आहे.

**अमलः**—पण तो आपल्या पुतणीबरोबर माझें लग्न लावून देणार आहे ना ?

**बावाजीः**—आ ! हा तर मोठाच पेंच पडला !

**अमलः**—तो म्हणाला कीं, माझी पुतणी कानांत मोत्यांच्या कुड्या घालून, सुंदर गुलाबी साडी नेसून चांगली नटूनसजून तुझी चिंगुली नवरी होईल; आणि झुंजुमुंजु होतांच ती स्वतः 'कपिली'ची धार काढील. आणि नव्या कोऱ्या हंडींतून फेंस भरलेलें ऊन ऊन ताजें दूध तुला प्यावयाला देत जाईल. आणि तिन्हीसांज झाली कीं, ती गाईच्या गोठ्या-भोंवतीं लामणदिवा फिरवून आणील—आणि मग चंपा न् त्याचे सात भाऊ यांच्या गोष्टी सांगण्यासाठीं ती तुझ्याजवळ येऊन बसेल.

**बावाजीः**—अहाहा ! किती सुंदर ! अशानें माझ्यासारख्या बैराग्याचेंही मन मोहून जाईल. पण माझ्या बाळा, ह्या लग्नाचा सध्यां विचार नको. ती गोष्टच सध्यां सोडून देऊं आपण ! हें बघ तूं लग्नाला उभा राहिलास कीं, त्याच्या कुटुंबांत पुतण्यांचा म्हणून कधीं तुटवडा पडणार नाहीं.

**माधवः**—तोंड बंद कर बुवा ! मला नाहीं आतां ऐकवत........

[ माधव जातो. ]

**अमलः**—बावाजी, काका आतां येथून गेले आहेत तर राजाकडून माझ्या नांवावर डाक-कचेरींत एखादें पत्र आलें आहे कां सांगा ना ?

**बावाजीः**—मला तर रागरंग असा दिसतो कीं, राजाचें पत्र केव्हांच निघून वाट चालत आहे.

**अमलः**—वाट चालत आहे ? कोठें आहे तें ? पाऊस पडून जाऊन आकाश अगदीं स्वच्छ झालें म्हणजे ज्या रस्त्यानें थेट रानांतून जातां येतें त्याच रस्त्यावर का तें आहे ?

**बावाजीः**—अगदीं तेथेंच ! तुला सारें कांहीं अगोदरच माहीत आहे तर !

**अमलः**—हो, मला सर्व माहीत आहे.

**बावाजीः**—अस्सें काय, पण कसें रे समजलें तुला ?

**अमलः**—कसें कोण जाणें ! पण सर्व कांहीं मला स्पष्ट समजतें. फार दिवसांमागेंच मीं तें कितीदां तरी पाहिल्यासारखें वाटतें. किती दिवसांमागें तें सांगतां येत नाहीं. केव्हां पाहिलें असावें तें तुम्हांला ठाऊक आहे का ? माझ्या डोळ्यांसमोर तें सर्व लख्ख उभें राहिलें आहे. पाहा ! पाहा ! तो पहा ! राजाचा डाकवाला ! त्याच्या डाव्या हातांत एक कंदील आहे व पाठीवर पत्रांची थैली आहे. रात्रंदिवस डोंगरावरून तो एकसारखा उतरत चालला आहे. आणि डोंगराच्या पायथ्याशीं धबधब्याचा ओढा बनला आहे ना ? त्या ठिकाणीं बांधावरून पाऊलवाटेनें तो मक्याच्या शेतांतून चालला आहे. तो पाहा त्याला उंसाचा मळा लागला. उंच उंच उंसाच्या कांड्यांमधून अरुंद, चिंचोळ्या वाटेनें जातांना तो आतां दिसेनासा झाला पाहा ! रानकिडे किर्र किर्र आवाज करताहेत—एकही मनुष्य दृष्टीस पडत नाहीं—लावी पक्षी आपले पंख फडफड हलवून आपल्या लांब चोंचींनीं माती विखुरताहेत—अशा त्या मोकळ्या कुरणापाशीं तो येऊन पोहोंचला. तो अगदीं जवळ येऊन ठेपलासा वाटतो. माझें अंतःकरण कसें आनंदित झालें आहे !

**बावाजीः**—पोरवयांतील पाणीदार नजर आज नसली, तरी तुझ्या संगतींत मलाही सर्व लख्ख दिसत आहे.

**अमलः**—ही डाक-कचेरी ज्याची आहे, तो राजा तुम्हाला माहीत आहे कीं हो, बावाजी ?

**बावाजीः**—आहे तर काय झालें माहीत ? मी त्याच्याकडे रोज भिक्षा मागावयाला जातों.

**अमलः**—फार छान ! मी बरा झालों म्हणजे मला सुद्धां त्याच्याकडे भिक्षा मागण्यासाठीं गेलें पाहिजे. नाहीं का, बावाजी ?

**बावाजीः**—माझ्या बाळा, तुला भिक्षा मागण्याची जरूर नाहीं, तो स्वखुषीनें तुला देईल.

**अमलः**—तसें नाहीं उपयोगी. मीं त्याच्या दारापाशीं उभा राहीन व मोठ्यानें म्हणेन "हे राजा, तुझा जयजयकार असो !" आणि मृदंगाच्या नादावर नाचून मी त्याच्याजवळ दान मागेन, हें काम किती मजेदार आहे. नाहीं ?

**बावाजीः**—वा, मोठीच बहार उडेल आणि आपण दोघे बरोबर गेलों तर माझी वांटणी पुरोपूर माझ्या पदरांत पडेल. पण तूं काय मागणार ?

**अमलः**—मीं असें मागणें मागेन–"हे राजा, तूं मला आपला डाकवाला कर. म्हणजे मी कंदील हातांत घेऊन दारोदर तुझीं पत्रें वांटीत फिरत राहीन. सर्व दिवसभर मला घरीं बसून राहावयास सांगूं नकोस !"

**बावाजीः**—पण माझ्या बाळा, घरीं राहावें लागलें म्हणून त्यांत काय एवढें मोठें वाईट वाटण्याजोगें आहे ?

**अमलः**—तसें वाईट वाटण्यासारखें नाहीं कांहीं. पहिल्या प्रथम त्यांनीं मला जेव्हां येथें कोंडून ठेवलें तो दिवस मला लांबच वाटला. पण

राजाची डाक-कचेरी येथें उघडल्यापासून मात्र मला अधिक अधिक घरांत राहावेंसें वाटूं लागलें आहे. आणि राजाकडून मला एखादे दिवशीं पत्र येईल असें जेव्हां मला वाटतें तेव्हां मी अगदीं आनंदांत असतों. आणि मग मला एकटें व शांतपणें पडून राहाण्याचें कांहींच वाटत नाहीं. पण राजाच्या पत्रांतील मजकूर मला समजेल कीं नाहीं कोण जाणे !

**बावाजीः**—जरी तुला मजकूर समजला नाहीं तरी त्या पत्रावरचें तुझें नुसतें नांव पाहून तुझें समाधान होणार नाहीं काय ?

( माधव प्रवेश करतो )

**माधवः**—तुमच्या दोघांच्या पायीं मी कोणत्या किचाटांत सांपडलों आहें याची तुम्हांला कांहीं कल्पना आहे का ?

**बावाजीः**—झालें तरी काय एवढें ?

**माधवः**—मी असें ऐकतों कीं, तूं अशी भूमका उठवून दिली आहेस कीं, तुम्हां दोघांशीं पत्रव्यवहार करण्यासाठीं राजानें येथें डाकघर उघडलें आहे म्हणून.

**बावाजीः**—बरें मग, त्यांत विशेष काय झालें ?

**माधवः**—आपल्या पंचानन पाटीलबोवांनीं ती गोष्ट बिननांवी अर्ज पाठवून राजाला कळविली आहे.

**बावाजीः**—राजाच्या कानावर सर्व कांहीं गोष्टी जातात हें आपल्याला माहीत नाहीं का ?

**माधवः**—मग जपून वागावयाला काय होतें ? राजाचें नांव विनाकारण पुढें कशाला काढतां ? अशामुळें तूं माझा नाश करशील.

**अमलः**—कां हो बावाजी, राजा आपल्यावर रागावेल ?

**बावाजी:**—रागावेल ! भलतेंच ! आणि तुझ्यासारख्या लहान मुलावर आणि माझ्यासारख्या फकीरावर राजाला रागावूं तर दे म्हणजे सांगतों कसें काय आहे तें !

**अमल:**—बावाजी, सकाळपासून माझ्या डोळ्यांवर काळोखी येत चालली आहे असें मला वाटतें. सर्व जग मला स्वप्नाप्रमाणें दिसतें. शांत, शांत व्हावें अशी मला फार आतुरता वाटते. मुळींच बोलावेंसें वाटत नाहीं. राजाचें पत्र येणार नाहीं का ? समजा, ही खोली एकाएकीं विरून गेली तर–समजा.

**बावाजी:**—( अमलला वारा घालून ) माझ्या सोन्या, राजाचें पत्र आज नक्की नक्की येईल बरें !

( वैद्यबुवा प्रवेश करतात. )

**वैद्य:**—आज आतां बाळ, तुला कसें काय वाटतें !

**अमल:**—आज मला फार बरें वाटतें. माझें सगळें दुखणें पार निघून गेलें !

**वैद्य:**—( माधवाला एकीकडे ) ही हंसरी मुद्रा कांहीं बऱ्याचें लक्षण नव्हे. एकदम बरें वाटणें हें तर अगदीं दुश्चिन्ह ! चक्रधन म्हणतो........

**माधव:**—मेहेरबानी करून, वैद्यबुवा, तुमचा तो चक्रधन बाजूला राहूं द्या. काय होणार तें सांगा.

**वैद्य:**—आतां तो थोड्या वेळचा सोबती आहे असें वाटतें ! माधवराव, मी तुम्हांला तरी पूर्वींच बजावून सांगितलें होतें. त्याला थंड हवा बाधलेली दिसते.

**माधव:**—असें तर होऊं नये. मी या बाबतींत काळजी घेण्यांत पराकाष्ठा केली आहे. त्याला मी कधींच घराबाहेर जाऊं दिलें नाहीं आणि बहुतेक सर्व वेळ खिडक्या लावलेल्या आहेत.

**वैद्यः**—आज हवेमध्यें कांहीं चमत्कारिकच फेरबदल झाला आहे. मी जेव्हां आंत आलों तेव्हां तुमच्या पुढच्या दरवाजामधून वाऱ्याचा झोतच्या झोत मला लागला. तो अतिशय अपायकारक आहे. तर सर्व दरवाजे बंद करून टाका. त्यामुळें समाचारास येणाऱ्या लोकांना दोनतीन दिवस प्रतिबंध झाला तर कांहीं हरकत नाहीं ना ? आलेंच कोणी अचानक भेटायला तर पाठीमागचा दरवाजा आहेच. ही खिडकीसुद्धां तुम्ही बंद करून टाका. तीमधून संध्याकाळीं किरण आंत पडतात व रोग्याला जागें ठेवतात.

**माधवः**—अमलनें डोळे मिटले आहेत. बहुतेक झोंप लागत आहेसें वाटतें. मुद्रेवरून मनांत येतें—वैद्यबोवा, एक अनोळखी बालक घरीं आणून त्याच्यावर मी पोटच्या पोराप्रमाणें माया करीत आहें, आणि आतां तो मला सोडून जाणार हो, वैद्यबोवा !

**वैद्यः**—अं हें काय ? ते तुमचे पाटीलबुवा कां झुकत झुकत आंत येत आहेत ? काय त्रास हा ! माधवराव, मला गेलं पाहिजे. तुम्ही सगळीकडे फिरून दरवाजे चांगले घट्ट बंद केले आहेत कीं नाहीं हें पाहिलेंत तर बरं होईल. मी घरीं जातांक्षणींच एक जालीम औषध पाठवून देतों तें त्याला देऊन पाहा. त्याला जर वांचवितां येणें शक्य असेल तर तेवढाच एक निर्वाणीचा उपाय आहे.

[ माधव व वैद्य जातात. ]

( पाटील प्रवेश करतो. )

**पाटीलः**—अरे काय रे पोरा——

**बावाजीः**—( गडबडीनें उठून ) पाटीलबुवा. जरा चूप राहा.

**अमलः**—नको, बावाजी, मीं झोपीं गेलों होतों असें तुम्हांला वाटलें का ? मला झोंप लागली नव्हती. मला सर्व कांहीं ऐकूं येतं—

आणि दूरदूरचे आवाज सुद्धां. मला असा भास होतो कीं, आई आणि बाबा उशापाशीं बसलीं आहेत व माझ्याशीं बोलत आहेत.

( माधव प्रवेश करतो. )

**पाटील:**—कायरे माधव, तूं अलीकडे बड्या बड्या लोकांचा अगदीं जानी दोस्त झाला आहेस म्हणे.

**माधव:**—पाटीलबुवा, कशाला उगीच गरीबाची चेष्टा करतां ? आम्ही बोलूनचालून साधेभोळे लोक.

**पाटील:**—पण तुझा हा पोरगा तर राजाकडून पत्र येण्याची वाट पाहात आहे !

**माधव:**—त्याचें काय तुम्ही ऐकतां ! अगदीं मूर्ख मुलगा आहे तो !

**पाटील:**—लक्ष न देऊन कसें चालेल ! असें खानदानीचें घराणें राजाला थोडेंच दुसरें मिळणार आहे. राजानें आपलें नवें डाक-घर नेमकें तुमच्या खिडकीसमोरच कां उघडलें तें नाहीं ठाऊक ? अरे ए पोरा, राजाचें तुला एक पत्र आलें आहे पत्र—

**अमल:**—( एकदम उठल्यासारखें करून) खरें, अगदीं खरेंच का !

**पाटील:**—खोटें कसें असेल ? तूं तर राजाचा दोस्त. हें पाहा तुझें पत्र. ( एक कोरा कागदाचा चिटोरा दाखवून ) हा ! हा ! हा ! हेंच तें पत्र.

**अमल:**—अशी माझी चेष्टा करूं नका; बावाजी, सांगा पाहूं, तेंच कां पत्र ?

**बावाजी:**—खरेंच बाळ मी तुला सांगतों तें त्याचेंच पत्र आहे.

**अमल:**—मग तें दिसत कां नाहीं ? मला तें तर अगदीं कोरें करकरीत दिसतें. पाटीलबोवा, त्या पत्रांत काय आहे ?

**पाटीलः**—राजा म्हणतो, " मी तुला भेटावयास निघालोंच आहें. माझ्याकरितां थोडेसे पोहे तयार ठेवशील तर बरें. आतांशा मला पंचपक्वान्नांच्या जेवणाचा अगदीं वीट येऊन गेला आहे. " हा ! हा ! हा !

**माधवः**—( हात जोडून ) मी तुमची प्रार्थना करतों, पाटीलबोवा, अशा गोष्टीविषयीं आतां थट्टा पुरे झाली.

**बावाजीः**—थट्टा करतों काय ? त्याची काय छाती आहे ?

**माधवः**—तुमचेंही डोकें फिरलें वाटतें, बावाजी ?

**बावाजीः**—डोकें फिरलें म्हणतां तर फिरूं द्या. पण मला स्पष्ट वाचतां येत आहे कीं, राजवैद्याला घेऊन मी स्वतः अमलबाळाला भेटावयाला येतों असें राजानें लिहिलें आहे.

**अमलः**—बावाजी, बावाजी, ऐका, ऐका, हा त्याच्या शिंगांचा नाद ऐका, ऐकलात का ?

**पाटीलः**—हा ! हा ! हा ! त्याचें डोकें थोडें आणखी फिरल्याशिवाय त्याला नाहीं ऐकूं येणार असें वाटतें.

**अमलः**—पाटीलबोवा, मला वाटलें होतें कीं, तुम्ही माझ्यावर चिडलां असाल व मी तुम्हांला आवडत नसेन. तुम्ही मला राजाचें पत्र आणून द्याल, हें मला पूर्वीं खरेंही वाटलें नसतें. मला तुमची पायधूळ घेऊं द्या.

**पाटीलः**—आदर दाखविण्याची उपजत बुद्धि या मुलाच्या ठिकाणीं आहे बरें का ! जरी थोडासा मूर्ख आहे तरी त्याचें अंतःकरण प्रेमळ आहे.

**अमलः**—जवळजवळ चवथा प्रहर झाला असेल आतां, अशी माझी समजूत आहे. ऐका ऐका--ती घंटा ऐका—"डांग, डांग, डिंग,--डांग, डांग, डिंग. " संध्यातारा उगवला कां ? मला दिसत कां नाहीं बरं ?

**बावाजीः**—अरे, सर्व खिडक्या बंद केलेल्या आहेत. मी त्या उघडतों.

( बाहेरून दरवाजावर थापा बसतात )

**माधवः**—ही काय गडबड आहे ? कोण आहे तें ? काय त्रास !

( बाहेरून आवाज येतो. )

" दार उघडा. "

**माधवः**—पाटीलबोवा, दरवडेखोर नसले म्हणजे बरें.

**पाटीलः**—कोण आहे ? पंचानन पाटील विचारीत आहे असा ठणठणाट करावयाला तुम्हांला धास्ती कशी नाहीं वाटत ? पाहिलीत मजा ! थांबला आवाज एकदम ! पंचाननाचा आवाज आहेच तसा पल्लेदार ! हो ऽऽ! चोर काय; चोराचा बाप का येईना. बरं मला दाखवा पाहूं दरवडेखोर !

**माधवः**—( खिडकीबाहेर डोकावून ) आवाज थांबला हें कांहीं नवल नाहीं. त्यांनीं बाहेरचा दरवाजा फोडून टाकला आहे.

( राजदूत प्रवेश करतो. )

**राजदूतः**—आमचे राजाधिराज आज येणार !

**पाटीलः**—अरे बाप रे !

**अमलः**—रात्रीं कोणत्या प्रहरीं ?

**राजदूतः**—दुसऱ्या प्रहरीं.

**अमलः**—जेव्हां माझा मित्र रखवालदार गांवच्या वेशीवरून " डिंग डांग डिंग, डिंग, डांग, डिंग, " अशी घंटा वाजवील तेव्हां ना ?

**राजदूतः**—होय, तेव्हांच आपल्या बालमित्राची शुश्रूषा करण्यासाठीं राजानें आपला खास धन्वन्तरी पाठविला आहे.

( राजवैद्य प्रवेश करतो. )

**राजवैद्य:**—हें असें काय ? येथें किती कोंडल्यासारखें वाटतें. सर्व खिडक्या, दारें साफ उघडून टाका. ( अमलच्या अंगाला स्पर्श करून ) तुला कसें काय वाटतें, बाळ ?

**अमल:**—मला फार बरें वाटतें. वैद्यराज, फारच बरें. माझ्या सर्व वेदना थांबल्या. किती हुशारी व मोकळें वाटतें आतां. अंधाराच्या पलीकडे लुकलुकणारे सर्व तारे आतां मला दिसताहेत.

**राजवैद्य:**—मध्यरात्रीं जेव्हां राजेसाहेब येतील तेव्हां तुला बिछाना सोडून हिंडतां येईल इतकें बरें वाटेल काय ?

**अमल:**—आज किती दिवस मोकळें फिरण्यासाठीं माझा जीव खालींवर होत आहे. मी राजाला सांगेन कीं, मला ध्रुवतारा दाखवा म्हणून. मीं पुष्कळ वेळां तो पाहिलाही असेन, पण तो कोणता हें मला नक्की सांगतां येत नाहीं.

**राजवैद्य:**—तो तुला सर्व कांहीं सांगेल. ( माधवाला उद्देशून ) राजाच्या स्वागतासाठीं सुंदर फुलांच्या जाळींनीं खोली शृंगारून ठेव. ( पाटलाकडे बोट दाखवून ) हा मनुष्य येथें राहून चालणार नाहीं.

**अमल:**—नको, नको, वैद्यराज त्याला राहूं द्या. ते माझे मित्र आहेत. त्यांनींच तर मला राजाचें पत्र आणून दिलें.

**राजवैद्य:**—तूं म्हणतोस तसें कां होईना, बाळ. तो तुझा मित्र आहे तर त्याला राहूं दे.

**माधव:**—( अमलच्या कानांत गुणगुणून ) माझ्या सोन्या बाळा, राजाचें तुझ्यावर फार प्रेम आहे. तो स्वतः येत आहे; त्याच्याजवळ कांहीं तरी देणगी माग. आपली गरीबी आहे हें तुला माहीतच आहे.

**अमलः**—तुम्ही काळजी नका करूं, काका. मीं त्यासंबंधीं ठाम निश्चय केला आहे.

**माधवः**—तो काय बरें बाळ ?

**अमलः**—मला एक डांकवाला कर असें मी सांगेन म्हणजे मला दारोदार त्याचे संदेश देत देत लांब लांब हिंडतां येईल.

**माधवः**—( कपाळावर हात मारून ) अरेरे ! हेंच का एवढें मागणें मागणार ?

**अमलः**—काका, राजा आला म्हणजे आपण त्याला काय काय वस्तु भेट देणार ?

**राजदूतः**—त्यानें दूधपोहे तयार ठेवण्याची आज्ञा दिली आहे.

**अमलः**—दूधपोहे ! पाटीलबोवा, तुम्ही सांगितलेंत तें बरोबर. तुम्हीं असेंच सांगितलेंत ना ? तुम्हांला सर्व कळलें. आम्हांला कांहींच नाहीं कळलें.

**पाटीलः**—माझ्या घरीं तुम्हीं निरोप धाडीत असाल तर राजाच्या आगमनासाठीं मी अतिशय उत्तम व्यवस्था करूं शकेन.

**राजवैद्यः**—कांहीं जरूर नाहीं. आतां सर्वजण शांत राहा. त्याला झोंप लागूं लागली आहे. मीं त्याच्या उशाशीं बसतों. त्याला झोंप चांगली शांत लागली. दिवा मालवून टाका. फक्त तारकांचा प्रकाश आंत येऊं द्या. शांत राहा. त्याला झोंप लागली.

**माधवः**—( फकिराला उद्देशून ) हात जोडून पुतळ्यासारखा तेथें कशाकरितां उभा राहिला आहेस ? माझा धीर खचत चालला. सांग, चांगलीं चिन्हें दिसत आहेत कां ? ते खोलींत काळोख कां करीत आहेत ? नुसत चांदण्यांच्या प्रकाशानें कसें भागणार ?

**बावाजी:**—शांत राहा.........

( सुधा प्रवेश करते )

**सुधा:**—अमल ! अमल !

**राजवैद्य:**—त्याला झोंप लागली आहे.

**सुधा:**—त्याच्याकरितां मीं थोडीं फुलें आणिलीं आहेत. त्याच्या हातांत तीं दिलीं तर चालणार नाहीं का ?

**राजवैद्य:**—खुशाल दे.

**सुधा:**—तो जागा केव्हां होईल ?

**राजवैद्य**—राजानें येऊन हांक मारतांक्षणींच.

**सुधा:**—माझ्याकरितां त्याच्या कानांत दोन शब्द सांगतां का ?

**राजवैद्य:**—काय सांगूं ?

**सुधा:**—त्याला सांगा, सुधा तुला विसरली नाहीं.

( पडदा पडतो. )

**समाप्त.**